**पृष्ठ १४१. राजा सर टी. माधवराव**—हे गृहस्थ त्रावणकोर, बडोदा, वगैरे ठिकाणीं दिवाण होते व मराठींत कविताहि करीत. यांची त्या काळच्या मुत्सद्दीमंडळींत गणना होती.

**पृष्ठ १५७. खोटे दागिने घालावेत.** ही आगरकरांनीं कांहींशी विनोदानें पन्नास वर्षांपूर्वी केलेली सूचना आजकाल फारच मोठ्या प्रमाणांत लोकांच्या-विशेषत: स्त्रियांच्या—आचरणांत आलेली दिसते.

**पृष्ठ १६४.** Reactionists म्हणजे ज्यांची विचारसरणी प्रतिगामी स्वरूपाची, प्रगतीला विरुद्ध आहे असे लोक. अलीकडे Reactionary हा शब्द विशेष प्रचारांत आहे.

**पृष्ठ १७४.** मि. ए. ओ. ह्यूम यांचा उल्लेख येथें ह्यूमसाहेब असा केलेला आहे. राष्ट्रीय सभेला यांचा मोठा पाठिंबा होता व कित्येकांच्या समजुतीप्रमाणें राष्ट्रीय सभा यांनींच काढली. हिंदुस्थानचे हे निरलस कैवारी होते व राष्ट्रीय सभेला चांगली स्थिति येण्यास यांचेच श्रम सुरुवातीला निःसंशय कारणीभूत झाले.

**पृष्ठ १७९. प्रो. जिन्सीवाले**—हे मुंबईच्या विल्सन कॉलेजांत संस्कृतचे अध्यापक होते. हे फार नामांकित वक्ते म्हणून त्या काळीं प्रसिद्ध होते व अतिशय कर्मठ ब्राह्मण होते. पण वेद हे पौरुषेय आहेत म्हणजे परमेश्वरानें उत्पन्न केलेले नसून माणसांनीं ( ऋषींनीं ) केलेले आहेत असें त्यांचें ठाम मत होतें व तें मत जुन्या लोकांना पसंत नव्हतें.

**प्रो. टिळक.** लोकमान्य टिळक. बाल गंगाधर टिळक. टिळक, आगरकर आपटे वगैरे मंडळींनीं फर्ग्युसन कॉलेज काढलें. पुढें मतभेद होऊन टिळकांनीं कॉलेज सोडलें, तरी त्यांना पुष्कळ दिवस प्रोफेसर टिळक साहजिकपणें म्हणत. पुढें टिळक मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद झाले, तेव्हां त्यांना नामदार टिळक म्हणूं लागले व पुढें त्यांना लोकमान्य हें नांव लोकांनीं प्रेमानें दिलें.

**पृष्ठ १८१. केसरीसाठीं कारागृहवास**—केसरीची सुरुवात झाल्यापासून त्याचे पहिले संपादक आगरकर होते व 'मराठा' या इंग्रजी पत्राचे संपादक टिळक होते. १८८२ सालीं कोल्हापूरचे दिवाण रा. ब. बर्वे यांनीं केसरी

व मराठा पत्राच्या संपादकांवर अब्रूनुकसानीची फिर्याद केली व त्या बाबतीं टिळक व आगरकर यांना शंभर दिवसांची कैद झाली, त्याचा हा उल्लेख आहे. (विशेष माहितीसाठीं रा. केळकरकृत टिळक-चरित्र भाग १ ला किंवा प्रो. अळतेकरकृत आगरकर-चरित्रात्मक निबंध, पहा.)

पृष्ठ १८२. मि. मलबारी—हे एक पारशी वृत्तपत्रकार होऊन गेले. स्त्रियांच्या संमतीचें वय वाढविण्यासाठीं जें बिल आलें होतें त्यासंबंधें यांनीं पुष्कळ खटपट केली होती. यांचें नांव संमतिवयाच्या वादांत वरचेवर येतें तें त्यामुळें.

पृष्ठ १८४. म. चि. आपटे—महादेव चिमणाजी आपटे. हे पुणें येथे नामांकित वकील होऊन गेले. सुप्रसिद्ध मराठी कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांचे हे चुलते. यांनीं जवळचा बहुतेक सर्व पैसा "आनंदाश्रम" या संस्थेला दिला. आनंदाश्रमानें शेंकडों संस्कृत ग्रंथ योग्य प्रकारें संस्करण करून प्रसिद्ध केले आहेत.

पृष्ठ १८६. रा. ब. नूलकर—हे पुण्याचे त्या वेळचे एक प्रसिद्ध नागरिक वरिष्ठ कायदे कौन्सिलचे सभासद होते.

रानडे म्हणजे न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे. भांडारकर म्हणजे प्रख्यात विद्वद्रत्न डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर.

पृष्ठ १९२. इलबर्ट बिल—फौजदारी गुन्ह्यांच्या बाबतींत न्यायदान करतांना हिंदी व युरोपियन हा भेद असूं नये अशा धोरणाचें हें बिल लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दीत मि. इलबर्ट, व्हाइसरायांच्या कौन्सिलचे सभासद, यांनीं आणलें. त्याविरुद्ध त्या वेळीं युरोपियन लोकांनीं फार ओरडा केला. त्यामुळें हें बिल मुळ स्वरूपांत मंजूर झालें नाहीं. या बिलामुळें लॉर्ड रिपन युरोपियन लोकांत फार अप्रिय व हिंदी जनतेंत अत्यंत प्रिय झाले. सध्यां युरोपियन लोकांवर हिंदी जज्जापुढें खटला भरतां येतो, पण त्यांना ज्यूरींत सर्व लोक आपले जातभाई असावेत असें मागण्याचा अधिकार आहे.

पृष्ठ १९४. मि. दादाभाई नवरोजींस "काळा" म्हणण्याची फजिती. हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीचे परमपूज्य पितामह दादाभाई

नौरोजी हे कांहीं दिवस पार्लमेंटचे समासद होते. त्या वेळीं अनेक वेळां मुख्य प्रधान असणारे लॉर्ड सास्लबरी यांनीं त्याच्याविषयीं बोलतांना "काळा आदमी" असे पोरकटपणाचे प्रलाप काढले होते. या मूर्खपणाबद्दल लॉर्ड-साहेबांच्या अनेक देशबंधूंनीं त्यांचे कान पिरगळले.

**पृष्ठ १९७. लॉर्ड विल्यम बेंटिंक** हे १८२८ ते १८३७ हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल होते. यांच्याच कारकीर्दींत सतीचा कायदा होऊन यांचें नांव हिंदुस्थानच्या सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत अजरामर झालें. ठग म्हणून लोक होते त्यांचाहि बंदोबस्त यांनीं केला. हिंदुस्थानांतील इंग्रजी शिक्षणाचा म्हणजे नव्या युगाचा पाया लॉर्ड बेंटिंक यांच्याच कारकीर्दींत घालण्यांत आला. इतरहि अनेक राजकीय सुधारणा यांनीं केल्या व हिंदी लोकांचा नागरिक म्हणून दर्जा यांच्याच कारकीर्दींत योग्य प्रकारें प्रस्थापित झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**पृष्ठ २०६.** 'राजा कालस्य कारणम्, ना विष्णुः पृथिवीपतिः' वगैरे जुन्या संस्कृत म्हणी आहेत. त्यांवरून लोकसत्तेला त्या काळीं किती कमी मान होता हें दिसून येतें.

**पृष्ठ २१२. लॉर्ड लॅन्सडाउन** हे १८८८-९४ हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल होते; म्हणजे आगरकरांचा सुधारक चालू असतांना बहुतेक वेळ हेच गव्हर्नर जनरल होते. यांच्या कारकीर्दींत सरहद्दीवर बरींच युद्धें झालीं, एक नवीन कौन्सिल ॲक्ट पसार होऊन अर्धवट निवडणुकीचें तत्त्व अंमलांत आलें व चांदीच्या भावांत एकदम उतार होऊन चांदीच्या टांकसाळी बंद करण्यांत आल्या.

**पृष्ठ २२६. टिळक व आगरकर** हा लेख आगरकरांचा स्वभाव व वृत्ति फार उत्कृष्टपणें दाखवितो व टिळकांकडे पाहण्याची त्यांची दृष्टि काय होती हें स्पष्ट करतो.

**पृष्ठ २३१. कविवाक्याचें स्मरण.** हा श्लोक प्रख्यात संस्कृत नाटककार भवभूति याचा आहे. भवभूति हा आगरकरांचा विशेष लाडका कवि होता.